रस्ता सुरक्षा निधीमधून करावयाच्या खर्चाच्या प्रस्तावाबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमव्हीआर-०१२४/प्र.क्र.०५/परि-२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० जून, २०२५

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दिनांक ०१ सप्टेंबर, २०१६.
२) शासन अधिसूचना क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दिनांक १७ ऑक्टोबर,२०१६.
३) शासन निर्णय, क्र.एमव्हीआर-०४२२/प्र.क्र.८३/परि-२, दिनांक ११.१०.२०२२.
४) शासन पत्र क्र. एमव्हीआर-०१२४/प्र.क्र.०५/परि-२, दिनांक १०.१२.२०२४, दिनांक १२.०२.२०२५.

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.२९५/२०१५ यामध्ये रस्ता सुरक्षा विषयक बाबींचा वेळोवेळी आढावा घेऊन मा.सर्वोच्च न्यायालयास अहवाल सादर करण्यासाठी रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समितीची स्थापना केली आहे. सदर समितीने रस्ता सुरक्षाविषयक कामकाजासाठी स्वतंत्रपणे रस्ता सुरक्षा निधी निर्माण करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्यानुसार दिनांक ०१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २९.११.२०२४ व दिनांक ०६.०२.२०२५ रोजी रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समितीची बैठक होवून सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधिन क्र.३ येथील दिनांक १०.१२.२०२४ व दिनांक १२.०२.२०२५ च्या पत्रान्वये निर्गमित केले आहे. उक्त बैठकीतील मान्यता दिलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या रस्ता सुरक्षा समितीने दिलेल्या निर्देशानुसार रस्ता सुरक्षा संदर्भात विविध प्रस्तावांना मान्यता देण्याकरीता मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. सदर समितीने मान्यता दिलेल्या प्रस्तावावरील बाबनिहाय खर्चाचे तपशिलवार विवरणपत्र पुढीलप्रमाणे आहेत :-

दिनांक : ०६.०२.२०२५ च्या बैठकीतील मान्य प्रस्ताव.

| अ.क्र. | विभागाचे नाव | प्रस्ताव | रक्कम (रु. कोटी) |
|---|---|---|---|
| १. | परिवहन विभाग | रस्ता सुरक्षा निधीमधून मान्यता देण्यात आलेल्या २७ (१७+१०) स्वयंचलित चलन चाचणी पथ (Automated Driving Test Track) उभारणीच्या सुधारित किमतींस मान्यता देण्याबाबत :- बुलढाणा, नागपूर (शहर), नागपूर (ग्रामीण), नागपूर (पुर्व), नांदेड, पुणे (आळंदी), अहमदनगर, औरंगाबाद, पुणे (हडपसर), कोल्हापूर, जळगाव, पुणे (सासवड), मुंबई (मध्य), ठाणे (नांदिवली), पनवेल, पेण, अमरावती (बडनेरा) या १७ ठिकाणांकरिता सुधारित अंदाजित रक्कम एकूण रु.२०२.९९ कोटी एवढ्या रक्कमेच्या (यापूर्वी मान्यता दिलेल्या रु. २१८.३९ कोटी ऐवजी) सुधारित अंदाजपत्रकास मान्यता देणे. तसेच, जालना, उस्मानाबाद, सिंधूदुर्ग (कुडाळ), वर्धा, यवतमाळ, अकलूज, बुलढाणा, गडचिरोली, हिंगोली, सांगली या १० ठिकाणांकरिता एकूण रु.१५५.९६ कोटी एवढ्या रक्कमेच्या (यापूर्वी मान्यता दिलेल्या रू. १६८.३६ कोटी ऐवजी) सुधारित अंदाजपत्रकास मान्यता देणे. | १७ ADTT करिता एकुण रु.२०२.९९ कोटी GST सहित<br><br>आणि<br><br>१० ADTT करीता<br>एकुण<br>रु.१५५.९६ कोटी GST सहित |
| २. | परिवहन विभाग | रस्ता सुरक्षा निधीमधून ११ स्वयंचलित चलन चाचणी पथ (Automated Driving Test Track) उभारणीस मान्यता देण्याबाबत :- अकोला, अंबेजोगाई, बारामती, लातूर, नंदूरबार, नाशिक, परभणी, श्रीरामपूर, सोलापूर, पिंपरी चिंचवड, वाशिम या ११ कार्यालयांमध्ये स्वयंचलित चलन चाचणी पथ (Automated Driving Test Track) उभारणे. | रु. १२९.४० कोटी + १८% GST |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | परिवहन विभाग | रस्ता सुरक्षा निधीमधून ६ स्वयंचलित वाहन परिक्षण केंद्र (ATS) उभारण्याबाबत :- रत्नागिरी, बीड, नंदुरबार, चिपळूण, गोंदिया, जळगाव या ०६ कार्यालयांमध्ये स्वयंचलित परिक्षण केंद्र (Automated Testing Station) उभारणे. | रु. ९९.५२ कोटी + १८% GST |
| ४. | परिवहन विभाग | रस्ते सुरक्षेच्या दृष्टीने परिवहन विभागातील कार्यरत क्षेत्रीय अधिकारी यांचेकरिता एकूण ६०० बॉडी-वॉर्न कॅमेरे खरेदी करणे. | रु. ७.०० कोटी + १८% GST |
| ५. | सह पोलीस आयुक्त (वाहतूक), मुंबई. | मुंबई वाहतुक पोलीस विभागाकरीता रस्ता सुरक्षा निधी अंतर्गत २ हिप्पो क्रेन आणि ४१ कर्षित वाहने खरेदी करणे. | २ हिप्पो क्रेन साठी रु.१.२२ कोटी आणि ४१ कर्षित वाहनांसाठी रु. ८.२० कोटी. |
| ६. | अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई. | राज्यातील रस्ता अपघाताची नोंद iRAD/eDAR App वर करण्यासाठी पोलिस विभागासाठी २३८४ टॅब खरेदी करणे. | रु. ८.१६ कोटी |

२. उपरोक्तप्रमाणे मान्यता दिलेल्या प्रस्तावांशी संबधित विभागाने शासनाने विहित केलेल्या नियम कार्यपध्दती/धोरणानुसार खरेदीप्रक्रिया राबविण्याची जबाबदारी संबधित विभागाची राहील.

३. संबधित विभागांनी मान्यता दिलेल्या सामग्रीशी संबधित देयके अदा करण्याकरीता विहित कार्यपध्दतीनुसार बाबनिहाय /तपशिलवार विवरणपत्रासह प्रमाणित करुन परिवहन आयुक्त कार्यालयाकडे निधी वितरणाचे प्रस्ताव सादर करावेत.

४. वरीलप्रमाणे प्राप्त झालेल्या प्रस्तावाची वित्तीय बाबी तपासून, छाननी करुन संबंधित विभागास/प्राधिकरणास निधी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांची राहील.

५. उपरोक्तप्रमाणे मान्य केलेल्या प्रस्तावावरील खर्च रस्ता सुरक्षा निधीच्या प्रयोजनासाठी सन २०२४-२०२५ च्या अर्थसंकल्पात मागणी क्र.बी-३, २०४१, वाहनावरील कर, (००) ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त, (०१) (०९) रस्ता सुरक्षा निधी (२०४१०५६४) (भारित) ३२, अंशदाने या लेखाशिर्षाखाली तसेच भारतीय रिझर्व्ह बँक मुंबई येथे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र. ०१५१४८०१०४१ कोड नंबर २१६७ यामधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०६१०१६५८४५३१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAGAR DHONDIRAM PATIL

Digitally signed by SAGAR DHONDIRAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b303a302c4285dac740589e585048fce69e2ef2ade0799db990bcdca3ead8311, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0255578456B2F5C05285C172A57976163858393ED219ED428FAD29A0BBE29DEE, cn=SAGAR DHONDIRAM PATIL
Date: 2025.06.10 16:59:39 +05'30'

**( सागर धों. पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा.मंत्री, मंत्रालय, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७. मा. उप सभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५.अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६. सह पोलीस आयुक्त (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१८. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.

१९. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.

२०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२१. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.

२२. वित्त विभाग (व्यय ८/कोषा ५/ अर्थसंकल्प १०) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

२३. गृह विभाग (बीयुडी १/बीयुडी २/परिवहन ४) मंत्रालय, मुंबई.

२४. निवडनस्ती/परि- २.